विद्युत कंपन्यांमधील शासकीय गुंतवणूक महाराष्ट्र राज्य विदयुत मंडळ सूत्रधारी कंपनीमर्यादित मार्फत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
शासन शुध्दीपत्रक क्रमांक -संकीर्ण-२०१५/प्र.क्र.६४/ऊर्जा-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक- १८ मे,२०१५

संदर्भ-: या विभागाचे शासन निर्णय

१) क्र.निधीवि-२०१४/प्र.क्र.४३/ऊर्जा-३, दि.०८/०८/२०१४
२) क्र.निधीवि-२०१४/प्र.क्र.४३/ऊर्जा-३, दि.३१/०३/२०१५
३) क्र.निधीवि-२०१४/प्र.क्र.४४(१)/ऊर्जा-३, दि.३१/०३/२०१५
४) क्र.निधीवि-२०१४/प्र.क्र.४४(२)/ऊर्जा-३ दि.३१/०३/२०१५
५) क्र.निधीवि-२०१४/प्र.क्र.४४(३)/ऊर्जा-३, दि.३१/०३/२०१५
६) क्र.निधीवि-२०१४/प्र.क्र.४४(४)/ऊर्जा-३, दि.३१/०३/२०१५
७) क्र.निधीवि-२०१४/प्र.क्र.४४(५)/ऊर्जा-३, दि.३१/०३/२०१५
८) क्र.निधीवि-२०१४/प्र.क्र.४४(७)/ऊर्जा-३, दि.३१/०३/२०१५

**प्रस्तावना -:**

महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाच्या पुनर्रचने नंतर (१) महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, (२) महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, (३) महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित हया तीन कंपन्यांची मालकी महाराष्ट्र राज्य विदयुत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्यादित हया चौथ्या कंपनीकडे आहे. या सूत्रधारी कंपनीची पूर्ण मालकी शासनाकडे आहे. त्यानुसार वरील तीन विद्युत कंपन्यांमधील शासकीय गुंतवणूक सूत्रधारी कंपनी मार्फत होणे आवश्यक होते. परंतु शासनाने माहे ऑगस्ट २०१४ ते माहे मार्च २०१५ हया कालावधीत संदर्भाधीन शासन निर्णयान्वये वरील तीन विद्युत कंपन्यांमध्ये थेट भांडवली गुंतवणूक दर्शविली आहे. त्यामुळे गुंतवणूकीच्या दर्शनी मूल्या इतके विद्युत कंपन्यांचे समभाग सूत्रधारी कंपनीच्या नांवे वाटप करणे शक्य झालेले नाही. परिणामी हया विद्युत कंपन्या सदर रक्कम सध्या “Share Application money pending allotment” म्हणून दाखवित आहेत. सदर रकमेचे समभाग सूत्रधारी कंपनीच्या नांवे होण्यासाठी सदर गुंतवणूक सूत्रधारी कंपनी मार्फत होणे आवश्यक आहे. त्यासाठी सदर विद्युत कंपन्यांमध्ये शासनाने भांडवली गुंतवणूक करण्यासाठी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयांना शुध्दीपत्रक काढण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शुध्दीपत्रक -:**

संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये शासनाने महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित व महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित हया कंपन्यांमध्ये केलेली भांडवली गुंतवणूक ही महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्यादित मार्फत केलेली भांडवली गुंतवणूक समजण्यात यावी. त्यामुळे

महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित व महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित हया कंपन्यांनी सदर रकमेच्या दर्शनी मूल्या इतके समभाग महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्यादित हया कंपनीच्या नांवे वितरीत करावेत.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत सथळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०५१८१२११३१६९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: CN = Vilas M Rajurkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.18 12:14:49 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०० ०२०.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कं. मर्या., हॉंगकॉंग बॅंक बिल्डींग, फोर्ट, मुंबई.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कं. मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कं. मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कं. मर्या., प्रकाशगंगा, वांद्रे (पूर्व), मुंबई.
९. सचिव, महाराष्ट विदयुत नियामक आयोग, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई-५.
१०. नियोजन विभाग (का-१४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
११. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१४/साधनसंपत्ती/सार्वजनिक उपक्रमे/व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-३२.
१२. ऊर्जा प्रभागातील सर्व कार्यासने.
१३. निवड नस्ती (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.